**नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र व अन्य बांधकाम प्रस्तावास मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : -टिआरआय-२०१४/प्र.क्र.०६/का.०५**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :-१४ जुलै, २०१५.

**वाचा** :-

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक ०४.०३.२०१४

२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.टिआरआय २०१४/प्र.क्र.६/का.०५, दिनांक २३.०३.२०१५

३)आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आस्था-२०१४/ गोंडवना संग्रहालय/प्र.क्र.१२०/का-१/३२५, दिनांक ३०.०६.२०१५

**प्रस्तावना : -**

नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राची स्थापना करण्याबाबत दिनांक २८.१२.२०१३ रोजी मा. महामहिम राष्ट्रपती, भवन सरकार यांचे उपस्थितीत संस्थेच्या सुवर्ण महोत्सव सोहळयाच्या उदघाटन निमित्त झालेल्या कार्यक्रमाच्या वेळी मा. राष्ट्रपती यांचे हस्ते गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राचे कोनशिलेचे अनावरण करण्यात आलेले आहे. त्याचवेळी नागपूर येथे उपकेंद्राच्या स्थापनेची घोषणा केलेली आहे.

२. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे येथे आदिवासी संस्कृतीचे संग्रहालय सन १९६५ मध्ये स्थापन करण्यात आले आहे. आदिवासी जीवन, कला व संस्कृतीचे दर्शन घडविणा-या मौल्यवान व दुर्मिळ वस्तुंचा संग्रह पुणे येथे करण्यात आलेला आहे. आदिवासी दाग-दागिने, देवदेवता, मुखवटे, दैनंदिन वापराच्या वस्तू, शेतीसाठी वापरण्यात येणारी हत्यारे, त्यांचे पोशाख, इ. साहित्य महाराष्ट्रातील वेगवेगळया आदिवासी भागातून आणून ते संग्रहालयात प्रदर्शित केलेले आहे. याशिवाय आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्थेमार्फत स्पर्धा परीक्षा मार्गदर्शनाचे कार्यक्रम व योजनांचे मुल्यमापन करण्यात येते.

३. सध्या पुणे येथे एक सांस्कृतिक संग्रहालय व प्रशिक्षण केंद्र आहे. याव्यतिरिक्त संस्थेचे एक उपकेंद्र विदर्भामध्ये स्थापन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यास अनुसरुन नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतीक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राची स्थापना करण्यास दिनांक ०४.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यांत आली आहे.

नागपूर येथे गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र स्थापन करणेच्या दृष्टीने विविध बाबीवर विचार करण्यासाठी व तदअनुषंगाने शासनास शिफारशी सादर करण्यासाठी संदर्भाधिन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये एक समिती गठित करण्यात आली आहे.

४. गोडवना संग्रहालयाकरिता मौ.चिखली, नागपूर येथे खरेदी केलेली जागा शहरापासून दूर असून उपलब्ध जागा प्रस्तुत प्रयोजनार्थ अपुरी असल्याने अन्य ठिकाणी जागा शोधण्यात आली असता अपर आयुक्त, आदिवासी विकास,नागपूर यांच्याकडील नागपूर शहरातील भुमापन क्र.५३ नुसार ५.५५ एकर इतकी जागा उपलब्ध आहे. सदर जागेमध्ये ६४४ चौ.मी. क्षेत्रफळावर अपर आयुक्त यांचे निवासस्थान व ६४० चौ.मी. इतक्या क्षेत्रफळावर जीर्णावस्थेतील कर्मचारी निवासस्थान आहे. मालमत्ता पत्रकातील नोंदीनुसार सदर जागेची मालकी अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांची आहे. सदर जागा गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र बांधकामासाठी योग्य आहे किंवा कसे यासाठी दिनांक २५.०६.२०१५ रोजी मा. सचिव, आदिवासी विकास, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे, कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास (NIT), अतिरिक्त आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांनी या जागेची प्रत्यक्ष पाहणी केली असता सदर जागा ही गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्रासाठी योग्य असल्याचे निदर्शनास आले. त्यानुषंगाने आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी दिनांक ३०.०६.२०१५ च्या पत्रान्वये सदर जागेवर गोंडवना आदिवासी सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राचे बांधकाम करण्याबाबत शासनाच्या मान्यतेसाठी प्रस्ताव सादर केला आहे.

५. त्या अनुषंगाने नागपूर शहरातील आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांचे व त्यांच्या अधिनस्त अधिकारी/कर्मचारी यांचे निवासस्थान असलेल्या ५.५५ एकर जमीनीवर अस्तित्वातील बांधकामाचा पुर्नविकास करुन सदर जागेत गोंडवना सांस्कृतिक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र व अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर कार्यालयाचे अधिकारी/ कर्मचारी यांचे निवासस्थान इत्यादी बांधकामास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या ताब्यात असलेली नागपूर शहरातील महसूली गाव नमुना सात व बारा मधील भूमापन क्र.१० व मालमत्ता पत्रक नगर भुमापन क्र.५३ नुसार एकूण ५.५५ एकर या जमीनीवर अस्तित्वातील बांधकामाचा पुर्नविकास करुन “गोंडवना सांस्कृतीक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र” आणि “अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या कार्यालयाचे अधिकारी/ कर्मचारी निवासस्थान” ही बांधकाम करण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

२. गोंडवना वस्तु संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्राचे आदिवासी संस्कृतीशी अनुरुप असे संकल्प चित्र तयार करणे, वरीलप्रमाणे बांधकामे विकसीत करण्याकरिता बांधकाम आराखडा व अंदाजपत्रक, नकाशे वास्तुविशारदाकडून तयार करुन घेणे व ते संबंधीत महानगरपालिका क्षेत्रातील समुचित प्राधिकरणाकडे मंजूरीसाठी सादर करणे व इतर अनुषंगीक कामासाठी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना प्राधिकृत करण्यांत येत आहे.

३. गोंडवना सांस्कृतीक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्रासाठी भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत जनजाती कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली येथे PAC (Project Apprisal Committee) समितीच्या बैठकीमध्ये सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात प्राप्त झालेला रु. १०.०० कोटी व सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेला रु. ११.०० कोटी मधुन सदर बांधकाम प्रकल्पावरील खर्च भागविण्यात येईल.

४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी गोंडवना आदिवासी सांस्कृतीक संग्रहालय तथा प्रशिक्षण उपकेंद्र आराखडा तयार करण्याकरिता वास्तुविशारद/संस्थेची निवड करणे, त्याचे संकल्प चित्र, अंदाजपत्रक व नकाशे इत्यादीचे प्रस्ताव संदर्भाधिन क्र. २ च्या दिनांक २३.०३.२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यांत आलेल्या समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१४१७१०३२९९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2015.07.14 17:40:24 +05'30'

( ल.गो. ढोके )
उप सचिव

**प्रति,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय
४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
६. विभागीय आयुक्त, नागपूर

७. जिल्हाधिकारी, नागपूर

८. कार्यकारी अधिकरी, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर

९. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर

१०.अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर

११.संचालक, पुरातत्वे आणि संग्रहालय, महाराष्ट्र राज्य

१२.निवड नस्ती (का.०५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.